**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास हेल्पलाईन योजनेकरिता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-अविवि-२०१७/प्र.क्र.७२/का-९**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दि. २६ मे, २०१७.

वाचा:- (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८ एप्रिल, २०१७.
(२) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.१/का-४/२०१६-१७, दि.१९ एप्रिल, २०१७.

**प्रस्तावना**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामध्ये अल्पसंख्याक समुदायातील लोकांना शासकीय कामकाजाबाबत वेळोवेळी उद्भवणाऱ्या अडचणीबाबत मार्गदर्शन करण्यासाठी व शासनाने अल्पसंख्याक समाजासाठी सुरु केलेल्या विविध योजनांबाबत लोकांच्या शंकांचे निरसन करण्यासाठी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या कार्यालयात एक हेल्पलाईन सुविधा योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांचा खर्च भागविण्याकरिता मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२, समाज कल्याण-२००, इतर कार्यक्रम- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१)(११) मदत वाहिनीकरिता सहायक अनुदान (२२३५ ए-१७८)- ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षांतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता रू. १०,००,०००/- (अक्षरी रू. दहा लक्ष फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. माहे एप्रिल, २०१७ ते डिसेंबर, २०१७ करिता सदर मंजूर निधीच्या ८० % निधी मर्यादेपर्यंत वितरीत करण्यासाठी उपरोक्त क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेल्या आहेत. त्यास अनुसरून संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने हेल्पलाईन योजनेकरिता निधी वितरणाची मागणी केली आहे. माहे एप्रिल २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरीता रू.३,३३,३३२/- (अक्षरी रू. तीन लक्ष तेहतीस हजार तीनशे बत्तीस फक्त) इतके अनुदान खाली दर्शविलेल्या मासिक निधी विवरणाप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक

आयोग यांनी खर्च विहीत मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात योजनांतर्गत बाबीसाठी माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरिता महत्त्वाच्या बाबींकरिता खालीलप्रमाणे योजनेतर अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

| **"मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२, समाज कल्याण-२००, इतर कार्यक्रम- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१)(११) मदत वाहिनीकरिता सहायक अनुदान (२२३५ ए-१७८)- ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)"** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | **माहे एप्रिल, २०१७ ते जुलै, २०१७ या चार महिन्यांकरिता मंजूर अनुदान** | | | |
| **अ. क्र.** | **तपशीलवार लेखाशीर्ष** | **सन २०१७-१८ साठी अर्थ संकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान** | **एप्रिल, २०१७** | **मे, २०१७** | **जून, २०१७** | **जुलै, २०१७** |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | **२२३५ ए १७८** | १०,००,०००/- | ८३,३३३/- | ८३,३३३/- | ८३,३३३/- | ८३,३३३/- |
| | **एकूण** | | रू. ३,३३,३३२/- (अक्षरी रू. तीन लक्ष तेहतीस हजार तीनशे बत्तीस फक्त) | | | |

२. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०१७-१८ च्या मासिक निधी विवरण पत्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र. १ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतूदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.

३. उपरोक्त रक्कम "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२, समाज कल्याण-२००, इतर कार्यक्रम- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१)(११) मदत वाहिनीकरिता सहायक अनुदान (२२३५ ए-१७८)- ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४. " सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२

अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/ अर्थ-३, दि. १८ एप्रिल, २०१७ मधील परिच्छेद ७ ते १८ येथील अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अ.क्र. ३ व ९ मधील अटींची पुर्तता होत असून प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. "

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२६१६३९३८३६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MINORITY DEVELOPMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bcd09896471a6f90b80581ca42d45e27f07ad7e99a45bec3a7579cf10330fcd, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2017.05.26 16:43:27 +05'30'

**(अशोक गायकवाड)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१२) व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
१३) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई,
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ महामंडळ, औरंगाबाद,
१५) कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई,
१६) अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई,
१७) कक्ष अधिकारी (का. ७ व ८), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवडनस्ती (कार्यासन-९)